शासकीय निमशासकीय सेवेतील सरळसेवा भरती व पदोन्नती मधील मागासवर्गीयांचा अनुशेष भरुन काढण्यासाठी विशेष भरती मोहिम सुरु करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
परिपत्रक क्रमांक:बीसीसी-1095/966/प्र.क्र.5/95/16-ब,
मंत्रालय, मुंबई 400 032, दिनांक 28 मे 1999.

वाचा :- 1) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक:बीसीसी-1095/966/प्र.क्र. 5/95/16-ब, दिनांक 29 ऑगस्ट 1998,

2) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक:बीसीसी-1095/966/प्र.क्र.5/95/16-ब, दिनांक 11 सप्टेंबर 1998,

3) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक:बीजीटी-1097/प्र.क्र.24-अ/अर्थसंकल्प-19, दिनांक 15 डिसेंबर 1998,

4) शासन शुध्दीपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक:बीसीसी-1095/966/प्र.क्र.5/95/16-ब, दिनांक 18 डिसेंबर 1998.

परिपत्रक :- वरील संदर्भाधीन दिनांक 29 ऑगस्ट 1998 च्या परिपत्रकान्वये शासकीय-निमशासकीय सेवेतील सरळसेवा भरती व पदोन्नती मधील मागासवर्गीयांची अनुशेषाची रिक्त पदे भरण्यासाठी विशेष भरती मोहिम सुरु करण्यात आली आहे. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक:बीजीटी-1097/प्र.क्र.24-अ/अर्थ-19, दिनांक 2 जून 1998 अन्वये सहा महिन्यांपेक्षा अधिक काळ रिक्त राहिलेली पदे व्यपगत होतील असे जे आदेश दिले होते ते आदेश विशेष भरती मोहिमे अंतर्गत भरावयाच्या अनुशेषाच्या पदांसाठी दिनांक 15 डिसेंबर 1998 च्या शासन निर्णयान्वये दिनांक 2 जून 1998 चे आदेश रद्द केले असून शासन निर्णयान्वये सुधारित आदेश निर्गमित केले आहेत. वित्त विभागाच्या दिनांक 15 डिसेंबर 1998 च्या सुधारित आदेशांच्या अनुषंगाने या विभागाच्या दिनांक 29 ऑगस्ट 1998 परिच्छेद 5 मध्ये खालीलप्रमाणे बदल करण्यात येत असून त्याप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

2. मागासवर्गीयांमधील राखील असलेली पण, रिक्त राहिलेली अनुशेषाची पदे ( Carried forward reserved vacancies ) जरी सहा महिन्यांपेक्षा अधिक काळ रिक्त असली तरी ती अनुशेषाची पदे व्यपगत होणार नाहीत. सबब वित्त विभागाच्या दिनांक 15 डिसेंबर 1998 च्या शासन निर्णयाप्रमाणे ती पुनरुज्जीवित करण्याचा प्रश्न उद्भवत नाही. मात्र चालू रिक्त ( Current Vacancies ) पदे 6 महिन्यांपेक्षा जास्त काळ रिक्त राहिल्यास अशी पदे पुनरुज्जीवित करण्यासाठी दिनांक 15 डिसेंबर 1998 च्या शासन निर्णयाप्रमाणे वित्त विभागाकडे प्रस्ताव पाठविणे आवश्यक राहील.

3. हे परिपत्रक वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक 62/99/अर्थसंकल्प-19, दिनांक 8 मार्च 1999 अन्वये त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

शि. शा. हिरीजगनेर,
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपालांचे सचिव,

मुख्य मंत्र्यांचे सचिव,

(कृ.मा.प.

एच-452(5000-6-99)

उप मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव/अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
* प्रबंधक, लोकायुक्त आणि उप लोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
सचिव, राज्य निवड मंडळ, मुंबई,
सचिव, सर्व प्रादेशिक निवड मंडळे,
संचालक, समाजकल्याण, पुणे,
संचालक, आदिवासी विकास विभाग, नाशिक,
संचालक, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे,
संचालक, सेवायोजन, मुंबई,
सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी,
सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी,
सर्व जिल्हा प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी प्रकल्प,
सर्व जिल्हा सेवायोजन अधिकारी,
सर्व मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती.

---

* पत्राने.